

# इसापच्या गोष्टी

मराठी : अश्विनी बर्वे



# मेंढ्या आणि सिंह



लांडगा मेंढ्यांच्या कळपातून एक मेंढरू चोरून आपल्या गुहेत घेवून जात होता.

.

रस्त्यात त्याला एक सिंह भेटला, त्याने मेंढरू हिसकावून घेतले.





एका सुरक्षित जागी उभा राहून लांडगा ओरडला,
"तू चोर आहे, ते मेंढरू माझे  आहे."

त्याचं बोलणं ऐकून सिंह चिडून म्हणाला.
"मेंढरू तुझे आहे, खरंच? कदाचित तुझ्या मित्राने ते तुला दिले असेल."



*जी व्यक्ती चोरी करते, जर तिला कोणी लुटले तर त्याला तक्रार करण्याचा अधिकार नसतो..*

# माणूस आणि वनदेवता




एक माणूस आणि एक वनदेवता
बरोबर प्रवास करत होते.

एक दिवस खूप थंडी होती आणि माणसाने आपल्या
हातावर फुंकर मारली. “तू असं का केलंस?”



“आपले हात गरम करण्यासाठी मी त्यावर फुंकर मारली,”
माणसाने समजावलं.

जेवण्यासाठी ते धर्मशाळेत आले. माणसाने आपल्या गरम सुपावर फुंकर मारली.



“तू असं का केलं?” वनदेवता म्हणाली.
“माझं सूप थंड करण्यासाठी मी त्यावर फुंकर मारली,” माणूस म्हणाला.



वनदेवता हे म्हणत तिथून पळाली, “मला त्या माणसाशी देणंघेणं नाही जो आपल्या एका फुंकेने गरम पण करू शकतो आणि गारही करू शकतो.”



*जी गोष्ट आपल्याला समजत नाही*
*त्यावर आपण विश्वास करू शकत नाही..*

# ससा आणि कासव

कासवाच्या संथ चालीवर ससा त्याची चेष्टा करत असे. “जिथं मला जायचं असतं तिथं मी पोहचतोच तुझ्या सारखं,” कासव म्हणालं .



“पण जिथं मला जायचं असतं तिथं मी खूप लवकर पोहचतो,” ससा म्हणाला.

कोल्ह्याने सूचना केली की तुमचा वाद मिटवण्यासाठी एक शर्यत लावायला हवी.

यावर ससा एवढ्या जोरात हसला की कासवाला राग आला. “मी तुझ्या बरोबर शर्यत लावेन आणि जिंकेन,” कासव म्हणालं.




शर्यत सुरु झाली नाही तर ससा डोळ्यासमोरून गायब झाला, तो एवढ्या जोरात पळाला.

सशाला आपल्या विजयावर एवढा विश्वास होता की तो थोड्यावेळ रस्त्याच्या कडेला झोपला.



कासव हळूहळू सतत चालत राहिला.




जेव्हा कासवाने शर्यत रेषा पार केली, आणि शर्यत जिंकली तेव्हा ससा झोपेतून जागा झाला.

*हळू पण सतत चालणाराच जिंकतो..*

# ससा आणि शिकारी कुत्रा



एक शिकारी कुत्रा एका सशाच्या मागे पळाला पण खूप लांब पळाल्यानंतर त्याने पाठलाग करणं सोडून दिलं.

एका मेंढपाळाने त्याची चेष्टा केली. “ससा अधिक चांगला पळतो.”



कुत्रा म्हणाला, “तुला त्यातला फरक कळत नाही, मी खाण्यासाठी पळत होतो पण तो जीव वाचवण्यासाठी पळत होता.” आपण कोणतं काम कसे करतो हे आपण ते काम का करत आहोत यावर अवलंबून असतं.

# कोल्हा आणि सारस

एक दिवस एका कोल्हाने एका सारस पक्ष्याला जेवण्यासाठी बोलावलं. खाण्यासाठी त्याने ताटलीत फक्त सूप ठेवलं.



आपल्या लांब चोचीमुळे सारस काही खाऊ शकला नाही. कोल्ह्याला वाटलं की त्याने सारस पक्ष्याला मूर्ख बनवलं आहे.

सारसने सुद्धा एक दिवस कोल्ह्याला जेवायला बोलावले. सारसने एका चिंचोळ्या भांड्यात जेवण दिलं.त्याचं तोंड खूप छोटं होतं. कोल्हा जेवणाची चव सुद्धा घेवू शकला नाही.



*आपण दुसऱ्या बरोबर असाच व्यवहार करायला पाहिजे, जसा व्यवहार आपल्याला दुसऱ्याकडून अपेक्षित आहे.*

# तहानलेला कावळा

एका तहानलेल्या कावळ्याला
एक मडकं दिसलं. ज्यात थोडं
पाणी होतं.पण त्याची चोच
तिथपर्यंत पोहचत नव्हती.



त्याने काही दगड
एकत्र केले.





मग त्याने एक-एक
करून ते दगड त्या
मडक्यात टाकले.
प्रत्येक दगडामुळे पाणी
थोडं वर येवू लागलं.

शेवटी त्याची चोच
पाण्यापर्यंत पोहचली
आणि त्याने पाणी पिऊन
आपली तहान भागवली.



*प्रयत्न केला तर आपण सगळी कामं करू शकतो.*

# मुलगा आणि बदाम

एका मुलाने बदाम ठेवलेल्या बरणीत हात घालून मुठभर बदाम घेतले.





पण तो आपला हात बरणीतून बाहेर काढूच शकला नाही.बदामांनी भरलेली मुठ मोठी होती आणि बरणीचं तोंड लहान होतं.

मुलगा आपला हात बाहेर काढण्याचा प्रयत्न करत होता पण काढूच शकत नव्हता. मग तो रडू लागला.



जवळून एक व्यक्ती जात होती तिला मुलाची समस्या कळली. ती व्यक्ती म्हणाली, “अर्ध्या बदामात आनंद मान, तुला हात काढायला कठीण जाणार नाही.”

*हावरटपणा वाईट गोष्ट आहे.*

# नाकतोडा आणि मुंग्या



उन्हाळाभर नाकतोडा उन्हात बसून
गाणं म्हणत राहिला.



तेव्हा मुंग्या हिवाळ्यासाठी अन्न
गोळा करण्यात व्यग्र होत्या.

हिवाळा आला तेव्हा नाकतोडयाने मुंग्याकडे खाणं मागितलं.



पण मुंग्यांनी त्याला रिकाम्या हाताने परत पाठवत म्हणाल्या, “जर तू उन्हाळ्यात गाणं म्हणत मुर्खपणा केला तर तू हिवाळा नाचत घालव.”



*आम्ही सगळा वेळ मौज-मस्ती करत घालवू शकत नाही.*

# सिंह आणि उंदीर



एका उंदराने झोपलेल्या सिंहाला उठवलं. सिंहाला राग आला.रागावलेला सिंह उंदराला मारायला निघाला. पण उंदीर म्हणाला, “कृपया, तुम्ही मला मारू नका, एक दिवस मी तुमच्या उपयोगी पडेल.”

“एक उंदीर सिंहाला काय मदत करू शकतो?” सिंहाने विचारलं. पण त्याने उंदराला सोडून दिले.



या घटने नंतर काही दिवसातच सिंह शिकाऱ्याच्या जाळ्यात सापडला.



जेव्हा उंदराने बघितले की सिंह संकटात आहे तेव्हा त्याने दोरी कुरतडून कापली आणि सिंहाला मोकळं केलं.

“आ तुम्ही माझ्या या गोष्टीला हसले होते की मी तुम्हांला काही मदत करू शकेल,” उंदीर म्हणाला. “पण आता तुम्ही बघितलं की एक उंदीर सुद्धा सिंहाला मदत करू शकतो.”



*आपण छोटे असू या मोठे*
*आपल्याला एकमेकांच्या*
*मदतीची गरज असू शकते.*

# मांजर आणि व्हिनस

एक मांजर एका युवकावर प्रेम करत होती.




मांजराने प्रेमाची देवता
व्हिनसला सांगितले की
तिला एक युवती कर.

आणि व्हिनसने तिला बनवलं.



युवकाला त्याच
युवतीविषयी प्रेम वाटले
आणि दोघांनी लग्न केले.






काही काळानंतर नव्या नवऱ्याने एक उंदीर बघितला.

ती आता मांजर नाही हे विसरून ती उंदराच्या मागे पळाली.



व्हिनस तिच्यावर एवढी नाराज झाली की तिने मुलीला परत मांजर केलं.



*आपलं रूप बदलणे सोप्प आहे*
*पण व्यवहार बदलणे कठीण असतं.*

# अस्वल आणि दोन प्रवासी

दोन प्रवाश्यांची गाठ एका अस्वलाशी पडली.



एक माणूस झटपट एका झाडावर चढला. दुसऱ्याला लपण्यासाठी कोणतीच जागा दिसली नाही तो जमिनीवर झोपला आणि मेल्याचं नाटक करू लागला.



अस्वल मेलेल्या
माणसाला खात
नाही म्हणून ते
निघून गेलं.



झाडावर चढलेला माणूस खाली आला आणि चेष्टेत दुसऱ्याला म्हणाला, “मी पाहिलं की अस्वलाने त्याचं तोंड तुझ्या कानाशी आणलं होतं. त्याने तुला काय सांगितलं?”

“त्याने मला सल्ला दिला,” त्याचा जोडीदार म्हणाला. “जे मित्र संकटाच्या काळात तुम्हांला सोडून देतात त्यांच्या बरोबर प्रवास करू नये.”



*संकटाच्या काळात मित्रांची पारख होते.*

# उत्तरेचे वारे आणि सूर्य



एक दिवस उत्तरेचे वारं आणि सूर्य यांच्यात वाद झाला की कोण अधिक शक्तिशाली आहे.

त्यांनी ठरवलं की दोघांपैकी जो रस्त्यावरून जाणाऱ्या प्रवाशाचे कपडे उतरवेल तो शक्तिशाली असेल.





उत्तरेकडचे वारे आधीपासून प्रयत्न करत होता.
तो त्याची पूर्ण ताकद लावून वाहत होता. पण वारं
जितकं जोरात वाहू लागलं तितक्या जोरात माणूस
आपले कपडे शरीराशी धरून ठेवू लागला.

शेवटी वाऱ्याने हार मानली आणि सूर्याला
म्हणाला की आता तू प्रयत्न कर.





सूर्य पूर्ण उष्णतेने चमकू लागला. प्रवासी
एका नंतर कं आपले कपडे काढू लागला.

शेवटी त्याने आपले सारे कपडे काढले
आणि झोपून सूर्यस्नान करू लागला.



*बळाचा उपयोग करण्याऐवजी*
*शरण जाणे श्रेष्ठ असतं.*

# मांजराच्या गळ्यात घंटी

मांजरापासून आपलं रक्षण कसं करायचं?
हा निर्णय घेण्यासाठी उंदरांनी एक सभा
बोलावली.एका उंदराने सुचवलं की मांजराच्या
गळ्यात घंटा बांधायला हवी. घंटेचा आवाज ऐकून
त्यांना कळेल की मांजर येत आहे.



“मांजराच्या गळ्यात घंटा बांधण्याची
सूचना चांगली आहे,” एका म्हातारा उंदीर
म्हणाला.

“पण
आपल्यातलं
कोण त्याच्या
गळ्यात घंटा
बांधेल?”



*सांगणं सोप्पं करणं अवघड .*

# घोड़ागाड़ीवर बसली माशी



एका शेतकऱ्याची घोड़ागाड़ी धुळीच्या रस्त्याने गडगडत चालली होती आणि धुळीचे ढग सगळीकडे उडवत होती.

घोड़ागाडी मध्ये
पाठीमागे बसलेल्या
माशीने विचार केला,,
“अरे, अरे! मी तर
खूप धूळ उडवत
आहे, काय असंच
आहे ना?”



*आपण नेहमी त्या गोष्टींचे श्रेय घेतो*
*ज्या आपण केलेल्या नसतात.*